**जिल्हाधिकारी, जालना यांच्या अधिनस्त क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी यांना त्यांच्या जुन्या ०३ निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः वाहन-२०२४/प्र.क्र.१७/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २६ जून, २०२४.

**संदर्भ:-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.जेपीएस-२०१४/प्र.क्र.०७/ई-८,दि.१२/०९/२०१६.
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.वाहन-२०२४/प्र.क्र.११/विनियम,दि.०२/०२/२०२४.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८,दि.२७/०६/२०२२.
४) नियोजन विभाग, शासन ज्ञापन, क्र.डिपीए-१०२२/प्र.क्र.१३९/का.१४८१,दि.१६/०१/२०२३.
५) जिल्हाधिकारी, जालना, यांचे पत्र क्र. २०२३/असं/साशा/कावि-दि.०८/०९/२०२३, दि.२२/०२/२०२४,दि.२७/०२/२०२४ व दि.०८/०४/२०२४.

**प्रस्तावना :-**

छत्रपती संभाजीनगर महसूल विभागातील लेखाशिर्ष "२०५३- जिल्हा प्रशासन" या खाली वेतन आहरित करणाऱ्या १३६ क्षेत्रिय अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दि.१२/०९/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. जिल्हाधिकारी, जालना यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्र.०५ अन्वये उपविभागीय अधिकारी, भोकरदन,तहसिलदार,जालना व परतूर यांना त्यांच्या जुन्या ०३ निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

छत्रपती संभाजीनगर महसूल विभागातील जिल्हाधिकारी,जालना यांच्या अधिनस्त क्षेत्रिय अधिकारी यांना या शासन निर्णयासोबतच्या "सहपत्र-अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे त्यांच्या पूर्वीच्या जुन्या ०३ निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणाऱ्या उपविभागीय अधिकारी/तहसिलदार यांच्या वाहनाकरीता प्रत्येकी रुपये ८.०० लक्ष इतक्या खर्चास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे -

१. निधी उपलब्धतेनुसार शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-वाहन-२०२४/प्र.क्र.११/ विनियम, दिनांक ०२/०२/२०२४ च्या शासन निर्णयामधील तरतुदीच्या अनुषंगाने उपविभागीय अधिकारी /तहसिलदार यांच्या वाहनाकरीता प्रत्येकी रुपये ८.०० लक्ष इतकी मर्यादा ठरविण्यात आली आहे. **निश्चित करण्यात आलेल्या वाहन किंमत मर्यादेत वस्तु व सेवा कराचा अंतर्भाव करण्यात आलेला नाही.** तथापि, सदर किंमतीमध्ये वाहनांच्या किंमतीसोबत टेम्परररी रजिस्ट्रेशन चार्जेस व सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादीसाठीच्या खर्चाचा अंतर्भाव करण्यात आलेला आहे. निधी उपलब्धतेच्या व विहित कार्यपध्दतीच्या अवलंब करुन वाहन खरेदी करण्यात यावी.

२. शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दि.०१/१२/२०१६ व क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४,दि. २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

३. या शासन निर्णयासोबतच्या “सहपत्र-अ” मध्ये नमूद निर्लेखित शासकीय वाहनांच्या बदली यापूर्वी नवीन वाहन खरेदी करण्यात आले नाही, या धारणेच्या अधिन राहून तसेच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन नवीन वाहन खरेदीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयासोबतच्या “सहपत्र-अ” मध्ये नमूद वाहनासाठी येणारा खर्च महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८,दि.२७/०६/२०२२ अन्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता जिल्हा वार्षिक योजनेतर्गत “गतिमान प्रशासन तथा आपात्कालीन व्यवस्थेचे बळकटीकरण” या योजनेच्या माध्यमातून नियोजन विभागाने जालना जिल्हयास उपलब्ध करुन दिलेल्या “मागणी क्र.ओ-४८, लेखाशीर्ष (२०५३ ए ३४२ ) - १३ कार्यालयीन खर्च” मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.११३/२०२४/व्यय-९, दिनांक ०६/०३/२०२४ व अनौपचारीक संदर्भ क्र.१२३/२०२४/विनियम, दि.१९/०३/२०२४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६२६१५३८१८५६१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR

Digitally signed by SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=bc3e3742bf263c80937ab54c636ad893656171177467ba8656a12c226f3029a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C55205CA6D1113BFAEC735BD2D1C5326D6B007C5CD3A46A6E4C4857E58AD2AFE, cn=SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR
Date: 2024.06.26 15:49:57 +05'30'

**( सुनिल कोठेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.अ.मु.स. (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२.
२. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर.
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-२,महाराष्ट्र,नागपूर.
४. जिल्हाधिकारी,जालना.
५. जिल्हा कोषागार अधिकारी,जालना.
६. उपविभागीय अधिकारी, भोकरदन
७. तहसिलदार, जालना / परतूर.
८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/विनियम), मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवड नस्ती,( कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

(शासन निर्णय, क्रमांक- वाहन-२०२४/प्र.क्र.१७/ई-८, सोबतचे सहपत्र-अ)

जिल्हाधिकारी,जालना यांच्या अधिनस्त क्षेत्रिय स्तरावरील अधिकाऱ्यांच्या वापरातील निर्लेखित वाहनांचे विवरणपत्र

| अ.क्र. | विभाग / जिल्हा | वाहन वापरणाऱ्या अधिकाऱ्याचे पदनाम | निर्लेखित वाहनाचा क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | छत्रपती संभाजीनगर विभाग (जिल्हा- जालना) | उपविभागीय अधिकारी, भोकरदन | एमएच-२१-एल-३९४ |
| २ | | तहसिलदार, जालना | एमएच-२१-एल-३६९ |
| ३ | | तहसिलदार, परतूर | एमएच-२१-बीएफ-१२७५ |